

प्रतिनियुक्तीने नियुक्ती करणेबाबत
**श्रीम. स्वाती गुरुलिंग स्वामी, अव्वल कारकून, उपविभागीय अधिकारी कार्यालय, अंबाजोगाई, जि. बीड**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र. आस्थाप्र २०२४ / प्र. क्र. ३२/ आस्था २**
मंत्रालय विस्तार, पहिला मजला,
मंत्रालय, मुंबई ३२
दिनांकः- ०९ जुलै, २०२४

**संदर्भः** १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. एसआरव्ही - २०१६ / प्र. क्र. १३७ / कार्या.१२, दि. १७ डिसेंबर, २०१६
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. एसआरव्ही - २०१६ / प्र. क्र. ५१० / कार्या.१२, दि. १६ फेब्रुवारी, २०१८
३) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. आस्थाप्र - २०१७ / प्र. क्र. ०८ / आस्थापना - २, दि. १४ जानेवारी, २०२१ आणि दि. २२ मार्च, २०२२

**शासन निर्णयः-**

सामान्य प्रशासन विभागाच्या दि. ०९ मार्च, २०१७ च्या अधिसूचनेन्वये सामाजिक न्याय व विशेष साहाय्य विभागातून इतर मागास बहुजन कल्याण या नवीन विभागाची निर्मिती करण्यात आली. सदर नवनिर्मित विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयांसाठी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालयाच्या आस्थापनेवर ८२१ पदांच्या सुधारित आकृतीबंधास शासनाच्या उच्चस्तरीय समितीच्या मान्यतेने संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयांन्वये मंजुरी देण्यात आली आहे. विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयातील उक्त मान्य संवर्गनिहाय मंजूर पदांवर पदभरतीच्या अनुषंगाने सेवाभरती नियम तयार करणे, तद्नंतर पदभरतीसाठी जाहिरात देऊन महाराष्ट्र लोकसेवा आयोग व विभागातील निवड समितीमार्फत भरती प्रक्रिया राबविणे यासाठी काही कालावधी लागणार असल्याने नियमित पदभरती होईपर्यंच्या कालावधीत समकक्ष वेतनश्रेणीतील पदांवर इच्छुकता मागवून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याबाबतची कार्यवाही या विभागामध्ये सुरू आहे.

२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, संदर्भ क्रमांक १ व २ अन्वये राज्य शासकीय कर्मचाऱ्यांच्या प्रतिनियुक्तीने नियुक्तीबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर सूचनांच्या अधीन राहून श्रीम. स्वाती गुरुलिंग स्वामी, अव्वल कारकून, उपविभागीय अधिकारी कार्यालय, अंबाजोगाई, जिल्हा बीड यांची इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या संचालक, इतर

मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांच्या कार्यालयामध्ये प्रमुख लिपिक या रिक्त पदावर पुढील अटी / शर्तीच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहेः-

१) श्रीम. स्वाती गुरुलिंग स्वामी, अव्वल कारकून यांची उक्त प्रतिनियुक्ती त्या ज्या दिवशी सदर पदावर रूजू होतील त्या दिवसापासून प्रथमतः तीन वर्षांच्या कालावधीसाठी किंवा सदर पदावर नियमित कर्मचारी उपलब्ध होईपर्यंत किंवा शासनाच्या पुढील आदेशापर्यंत यापैकी जे प्रथम घडेल तोपर्यंत असेल. सदर प्रतिनियुक्तीच्या कालावधीत आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या सहमतीने वाढ करता येईल.

२) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनास आवश्यक वाटली तर, प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना त्यांच्या मूळ कार्यालयाकडे परत पाठविण्याचा अधिकार शासनास राहील.

३) त्यांची सेवा प्रतिनियुक्तीच्या कार्यालयास आवश्यक वाटली नाही तर त्यांच्या सेवा मूळ विभागास परत करण्याची मुभा प्रतिनियुक्तीच्या कार्यालयास राहील.

४) त्यांनी जर आपल्या मूळ विभागाकडे परत जाण्याचा उद्देश आहे, अशी किमान ३ महिन्याची लेखी पूर्व सूचना सक्षम प्राधिकाऱ्यास /शासनास दिली तर त्यांना आपल्या मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

५) त्यांना उपरोक्त प्रतिनियुक्तीच्या कालावधीत प्रतिनियुक्ती भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

६) प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांना अनुज्ञेय असलेल्या रजा, गट विमा योजना, वैद्यकीय सवलत, रजा प्रवास सवलत इत्यादी सेवाविषयक बाबींच्या संदर्भात त्यांना त्यांच्या मूळ विभागातील सेवाविषयक नियम लागू असतील.

७) प्रतिनियुक्तीच्या बाबतीत त्यांच्या इतर प्रशासकीय बाबी इतर मागास बहुजन कल्याण विभाग आणि महसूल व वन विभाग, मंत्रालय यांच्यामध्ये विचारविनिमय करून ठरविण्यात येतील.

३. श्रीम. स्वाती गुरुलिंग स्वामी, अव्वल कारकून यांना उक्तप्रमाणे प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू होण्यासाठी जिल्हाधिकारी, बीड यांनी तात्काळ कार्यमुक्त करावे. श्रीम. स्वाती गुरुलिंग स्वामी, अव्वल कारकून यांना कार्यमुक्तीचे उपरोक्त आदेश प्राप्त झाल्यानंतर त्यांनी तात्काळ प्रतिनियुक्तीच्या कार्यालयात रूजू व्हावे. त्यासाठी त्यांना पदग्रहण अवधी, प्रवास खर्च इत्यादी अनुज्ञेय असणार नाही.

४. विभागाच्या प्रमुख लिपिक या पदाची वेतनश्रेणी (एस १३ , ₹३५४०० - ₹११२४००) अशी असून श्रीम.स्वामी एस १२, (₹३२००० - ₹१०१६००) वेतनश्रेणीत वेतन घेत असल्याने सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१६.०२.२०१८ मधील "परिच्छेद १) ख" मध्ये दिलेल्या सूचनांनुसार श्रीम.स्वाती गुरुलिंग स्वामी यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीतील देय असलेल्या वेतनाबाबतचे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

५. हा शासन निर्णय महसूल व वन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ७०९/ई ७, दि.०१.०७.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७०९१४४०२७१८३४ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

KISHOR ANANDRAO FULZELE

Digitally signed by KISHOR ANANDRAO FULZELE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=1943ef2dcbb6056b2cde1b40938cb965046d201c95d3481b7d025cdf61d623cb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=694B6E1A7216778D77DE53247F4CB565CFE21F0250C1211A03A9072F0D671FDD, cn=KISHOR ANANDRAO FULZELE
Date: 2024.07.09 14:53:13 +05'30'

**( किशोर फुलझेले )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीम. स्वाती गुरुलिंग स्वामी, अव्वल कारकून, उपविभागीय अधिकारी कार्यालय,अंबाजोगाई, जिल्हा बीड.

**प्रत,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)- १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
२. जिल्हाधिकारी तथा जिल्हा दंडाधिकारी बीड, जिल्हा बीड.
३. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
४. उपविभागीय अधिकारी तथा उपविभागीय दंडाधिकारी, अंबाजोगाई, जि. बीड
५. सह सचिव, महसूल व वन विभाग, (ई ७), मंत्रालय, मुंबई
६. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड/ पुणे.
७. निवडनस्ती.